राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरिता निधी वितरित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-३६१९/प्र.क्र.७५/पोल-३**
मंत्रालय, २ रा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० डिसेंबर, २०२१

वाचा :- १) शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक एमआयएस ०५०८/७४८/प्र. क्र.३२९/पोल-४, दि.२२.५.२००९.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे अध्यक्षतेखालील SEC (State Empowered Committee) समितीच्या दि. ४.७.२०१६ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
३) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील दि.१२.७.२०१६ व दि.२८.१२.२०१६ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य शिखर समितीच्या दि.१७.०१.२०१७, दि.०८.०२.२०१८, दि.०७.०९.२०१९, दि.२०.०७.२०२० व दि.१८.०५.२०२१ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
५) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/६१६२/सीसीटीएनएस प्रकल्प/१५/२०१०-२१, दि.०५.०८.२०२१, दि.०७.०९.२०२१, दि.०३.०९.२०२१.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेच्या अंतर्गत राज्यात सीसीटीएनएस प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पातर्गंत राज्यातील ११२९ पोलीस ठाणी व ६६९ वरिष्ठ पोलीस कार्यालये CAS (Core Application Software) सॉफ्टवेअरव्दारे जोडण्यात आली आहेत. सदर प्रकल्पाचे दि.१५.९.२०१५ रोजी मा.राज्यपाल महोदयांच्या हस्ते लोकार्पण पार पडले आहे. सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत जोडण्यात आलेल्या १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरिष्ठ कार्यालयामध्ये २ mbps नेटवर्क कनेक्टीव्हिटी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीसाठी व इतर आवश्यक बाबींकरीता येणारा खर्च राज्य शासनामार्फत करणे आवश्यक आहे.

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य शिखर समितीने दि.१८.०५.२०२१ रोजीच्या बैठकीत सीसीटीएनएस प्रकल्पाच्या सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयकांसाठी रु.८,१४,४२,६५२/- (पोल-४ कार्यासनाशी संबंधित “Modernisation” करिता रु.३,५१,००,०००/- वगळून) इतक्या खर्चास मंजुरी दिली. तसेच, सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता रु.३३,२२,१२,९५८/- एवढ्या देखभाल व दुरुस्तीच्या खर्चास मान्यता दिली आहे.

अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने मे. विप्रो यांनी दि.१५.०२.२०२१ ते दि.१४.०६.२०२१ या ४ महिन्यात O&M for CCTNS Application, Cloud Services and Helpdesk, Field Support Eng. यासाठी केलेल्या कामाचे रु.२,८९,७४,४९५/-, मे. विप्रो यांच्या देयकातून राखून ठेवलेले रु.२,७०,४१४/- व मे. एनआयसी, नवी दिल्ली यांनी दि.०१.०८.२०१८ ते दि.३१.०३.२०२० या कालावधीत राष्ट्रीय डेटा सेंटरमध्ये Disaster recovery services पुरविल्याबाबत रु.९३,४१,६६६/- असा एकूण रु.३,८५,८६,५७५/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तथापि उपलब्ध निधी विचारात घेता एकूण रु.३,८५,५७,३४८/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :

सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरिता सीसीटीएनएस प्रकल्पाचे सिस्टम इंटिग्रेटर मे. विप्रो यांनी दि.१५.०२.२०२१ ते दि.१४.०६.२०२१ या ४ महिन्यात O&M for CCTNS Application, Cloud Services and Helpdesk, Field Support Eng. यासाठी केलेल्या कामाचे रु.२,८९,७४,४९५/-, मे. विप्रो यांच्या देयकातून राखून ठेवलेले रु.२,४१,१८७/- व मे. एनआयसी, नवी दिल्ली यांनी दि.०१.०८.२०१८ ते दि.३१.०३.२०२० या कालावधीत राष्ट्रीय डेटा सेंटरमध्ये Disaster recovery services पुरविल्याबाबत रु.९३,४१,६६६/- असा एकूण रु.३,८५,५७,३४८/- (रुपये तीन कोटी पंचाऐंशी लाख सत्तावन्न हजार तीनशे अठ्ठेचाळीस फक्त) इतका निधी वितरित करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, व दुरुस्तीयाद्वारे व इतर आवश्यक बाबींसाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस, (००) १४ गुन्हा व गुन्हेगारी माग काढण्यासाठी नेटवर्क यंत्रणा (राज्य योजना), दत्तमत, (२०५५ ए०९७), ५०- इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली उक्त सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उक्त निधी कोषागारातून आहरण करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" व त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. उपरोक्त निधी सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत करण्यात आलेल्या कामासाठी केंद्र शासनाच्या निदेशानुसार खर्च करण्यात यावा व खर्च करण्यात आलेल्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. हा शासन निर्णय अनौपचारीक संदर्भ क्र.७५०/२०२१/व्यय-७, दि.२६.११.२०२१ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार व मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य शिखर समितीच्या (SAC) दि.२०.०७.२०२० व दि.१८.०५.२०२१ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२०१८२७०६०६२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rupali Sanjog Kabare

Digitally signed by Rupali Sanjog Kabare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, serialNumber=5cb43a03d973ff96aabbf02a74864a4681399fe663d8fbde0441a596beb3acdd, cn=Rupali Sanjog Kabare
Date: 2021.12.20 18:29:40 +05'30'

**( रुपाली कबरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. अपर पोलीस महासंचालक (नि व सं), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अभिलेख कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५. प्रकल्प संचालक, मे. विप्रो प्रा.लि., मुंबई.
१६. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१७. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड फाईल, पोल-३.